**श्रीगोंदा पोलीस ठाणे, अहमदनगर येथे गु.र.क्र.२०७/९९ प्रकरणी तत्कालीन सहायक पोलीस निरीक्षक श्री.जयस्वाल यांनी न्यायालयात स्वत:ची बाजू मांडण्याकरीता केलेल्या खर्चाच्या प्रतीपुर्तीस मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी २०१४/प्र.क्र. १८१ /पोल-१०**

२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २२.०५.२०१७

**प्रस्तावना :**

श्रीगोंदा पोलीस ठाणे, जिल्हा अहमदनगर येथे गु.र.क्र.२०७/९९ चे प्रकरणी, श्री.ओमप्रकाश माजीलाल जयस्वाल, तत्कालीन सहायक पोलीस निरीक्षक, धारावी पोलीस ठाणे, मुंबई यांनी त्यांचे शासकीय कर्तव्य पार पाडीत असताना, घडलेल्या घटनेच्या अनुषंगाने, त्यांचेविरुध्द केलेल्या फौजदारी कार्यवाहीविरुध्द, न्यायालयामध्ये स्वत:चा बचाव करण्याकरीता त्यांनी खालीलप्रमाणे न्यायालयीन खर्च केलेला आहे.

| अ. क्र. | संबंधित न्यायालय | वकीलांना अदा केलेल्या फी चा खर्च | खर्च करण्यास सहमती दिलेला प्रशासकीय विभाग |
|---|---|---|---|
| १. | मा.सत्र न्यायालय | रु.५०,०००/- | अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-४९४ /१६/व्यय-७, दिनांक ०३.१२.२०१६ अन्वये वित्त विभागाने सहमती दिलेली आहे |
| २. | मा. उच्च न्यायालय | रु.१,५०,०००/- | अनौपचारिक संदर्भ क्र. ४२६/६२९/Civil/Confl./२०१६/'A' Br., दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१६ अन्वये विधि व न्याय विभागाने सहमती दिलेली आहे. |
| ३. | मा. सर्वोच्च न्यायालय | रु.३,९०,०००/- | अनौपचारिक संदर्भ क्र. ४२६/६२९/Civil/Confl./२०१६/'A' Br., दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१६ अन्वये विधि व न्याय विभागाने सहमती दिलेली आहे. |
| | एकुण रुपये | रु.५,९०,०००/- (रु.पाच लक्ष नव्वन हजार फक्त) | |

सदरच्या न्यायालयीन खर्चाची प्रतीपुर्ती करण्यास, ते, महाराष्ट्र पोलीस मॅन्युअल, १९९९ मधील नियम २९७ (१) (बी) मधील तरतूदी नुसार पात्र आहेत, असे अभिप्राय विधि व न्याय विभागाने दिलेले आहेत. त्यास अनुसरुन, श्री.ओमप्रकाश माजीलाल जयस्वाल, तत्कालीन सहायक पोलीस निरीक्षक, यांनी, त्यांचेविरुध्द केलेल्या फौजदारी कार्यवाहीविरुध्द, न्यायालयामध्ये स्वत:चा बचाव करण्याकरीता केलेल्या एकुण रु.५,९५,०००/- (पाच लक्ष पंच्याणव हजार फक्त) इतक्या न्यायालयीन खर्चामधुन क्लेरीकल चार्जेस रु.५,०००/-(रु.पाच हजार) वगळून निव्वळ वकीलांना फी स्वरुपात केलेला खर्च रु.५,९०,०००/- (पाच लक्ष नव्वद हजार फक्त) इतक्या न्यायालयीन खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

उपरोक्त परिच्छेदातील प्रस्तावनेस अनुसरुन, श्रीगोंदा पोलीस ठाणे, जिल्हा अहमदनगर येथे गु.र.क्र.२०७/९९ चे प्रकरणी, श्री.ओमप्रकाश माजीलाल जयस्वाल, तत्कालीन सहायक पोलीस निरीक्षक, धारावी पोलीस ठाणे, मुंबई यांनी त्यांचे शासकीय कर्तव्य पार पाडीत असताना, घडलेल्या घटनेच्या अनुषंगाने, त्यांचेविरुध्द केलेल्या फौजदारी कार्यवाहीविरुध्द मा. सत्र, उच्च व सर्वोच्च न्यायालयामध्ये स्वत:चा बचाव करण्याकरीता त्यांनी केलेल्या रु.५,९०,०००/- (पाच लक्ष नव्वद हजार फक्त) इतक्या न्यायालयीन खर्चाची प्रतीपुर्ती करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-४९४ /१६/व्यय-७, दिनांक ०३.१२.२०१६, तसेच, विधि व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ दिनांक २१एप्रिल, २०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन, तसेच, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र - २०१५/प्र.क्र.२१/२०१५/ विनियम, दिनांक २९ जुलै, २०१५ अन्वये, वित्तीय अधिकार नियम नियम पुस्तिका - १९७८, भाग-पहिला, उपविभाग - दोन मध्ये नव्याने समावेश केलेल्या अ.क्र.४९ नियम क्र.१६६-अ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

यासाठी येणारा खर्च, या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

उपरोक्तप्रमाणे न्यायालयीन खर्चाची प्रतिपुर्ती करण्याबाबतची कार्यवाही तात्काळ करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२२१२३९२४६३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25b1cd893dfd4dc594def1c46424 65ecdafbdae899f879d9b4603fe37cfb3598 , cn=Arun Vishnupant Joshi
Date: 2017.05.22 12:50:37 +05'30'

(अ.वि.जोशी)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषन विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. लेखा कोषागार अधिकारी, पुणे.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. श्री. आमेप्रकाश माजीलाल जयस्वाल, पोलीस निरिक्षक, भरारी पथक, गु.अ.वि. (गुन्हे), पुणे.
८. विधी व न्याय विभाग (अे-ब्रँच), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (पोल-१०).